प्रकाशन क्रमांक ५७

# भावपुष्प

( गीत-संग्रह )

सौ. संजीवनी मराठे

ग. पां. परचुरे प्रकाशन मन्दिर, मुंबआी ४

मूल्य दीड रुपया

: प्रकाशक :

**ग. पां. परचुरे**

ग. पां. परचुरे प्रकाशन मन्दिर

गोरेगांवकर चाळ क्रमांक २

गिरगांव, मुंबअी ४



मुखपृष्ठ सजावट श्री. रघुवीर मुळगांवकर

प्रथमावृत्ति मे १९५१

: मुद्रक :

**विश्वनाथ वा. पै**

मधुकर प्रिंटिंग प्रेस

रविवारपेठ, बेळगाव.

# भावबोल

माझ्या गीतांना नावें नाहींत आणि चाली नाहींत. गीताचें पालुपद हेंच त्याचे नांव असते. आणि चाली तरी ठराविक का असाव्यात ? गीत गाण्याची वेळ आणि गीतगायक या दोहोंचा विचार करून समयोचित भावपूर्ण चाल गायकानें आपल्या गानप्रकृतीला साजेल त्याप्रमाणें योजावी असें माझें मत आहे. मी जो प्रयत्न माझ्या आवडीने केला आहे तेवढ्याची नोंद गीताबरोबर करून ठेवली आहे.

माझ्या गीतांचें कोडकौतुक केल्याबद्दल प्रकाशक आणि मुद्रकाचे मी आभार मानते. त्यांच्या रचनेबाबत बोलायचें तर श्री. विश्राम बेडेकर श्री. जी. एन्. जोशी यांच्याकडून मला खूपच मार्गदर्शन झालें. कवि गिरीशांनींहि मनोभावे प्रोत्साहन दिलें आहे. गीतांना ‘ हवेवरून ’ प्रसिद्धि दिल्याबद्दल आपल्या नभोवाणीची व तिच्या कलावंतांची मी सदैव ऋणी राहीन. रसिकाचें काय ? त्यांच्याच पायाशीं हें भावपुष्प वाहिलेलें आहे !

एप्रिल १९५१
खानापूर ( जिल्हा बेळगांव )

— **संजीवनी**



सारख्या उत्कृष्ट कवितेपासून सामान्य नाटकांतील नीरस पद्यापर्यंतच्या सर्व प्रकाराची भेसळ करण्यांत आली आहे. ही गोष्ट येथच थांबली असती तरी बरें होतें. तींत उरवणीला पुरवणी म्हणून, चित्रपटांतील नटवीं पदें, ध्वनि-मुद्रिकेसाठीं रचण्यांत आलेलीं कृत्रिम गाणीं वा छक्कडी याचाहि समावेश करण्यांत येऊं लागला आहे. भावगीताला आलेल्या या अतिव्याप्त अर्थामुळे(?) काव्यावर संगीताचें, म्हणजे कोणत्याहि जातीच्या संगीताचे आतिक्रमण झालं आहे हें मान्य केलेंच पाहिजे. त्यामुळें काव्यगायनाच्या क्षेत्रात अराजक किंवा गोंधळ माजला असल्यास नवल नाहीं.

भावगीत हें अर्थानें भावपूर्ण असावें व गायकानें तें अगदीं योग्य स्वर लावून म्हणावें. ही किमया फार थोड्यांना साधते. कुणी त्यांतील उत्कट भाव गद्यप्राय वाचून दाखवितात, तर कुणी मूळ भावाचा आघोळ घातल्याप्रमाणें त्यावर सारख स्वराचें पाणी ओततात. ज्याना हें औचित्य अचुक साधलें त्यांनीं मात्र भावगीतांतील सगळाच्या सगळा भाव, अगदी थेंब थेंब, झऱ्यां-तील पाण्याप्रमाणें टिपून काढला व तो रसिकांच्या स्वाधीन केला. मग रसनिष्पत्तींत स्वराला स्थान नाहीं कसें ? एकाद्या संदर निळसर मेघमालेला ज्याप्रमाणें सोनेरी किनार शोभून दिसते व तिच्या पोतावर ज्याप्रमाणें ती आपल्या किरणाच्या छटा टाकून तिचे सौंदर्य वाढविते, त्याचप्रमाणें योग्य स्वर हे भावगीताचें सौंदर्य वाढवितात. योजक मात्र तसा कुशल पाहिजे. या दृष्टीनें 'ऐकव तव मधु बोल' या उत्कृष्ट भावगीताला चाल लावणारे कै. मंजीखां व दुसऱ्या अनेक भावगीताना सुंदर सुरावटींत बसविणारे श्री. केशवराव भोळे यांची भावगीतांच्या चालीबाबतची कामगिरी अत्यंत मोलाची आहे. त्यांचें औचित्य व अचुकपणा हीं अनन्यसाधारण आहेत. सैगलच्या गळ्यांतून पाझरणारे स्वर अर्थप्रतीति व भावप्रतीति उत्कटतेनें करून देतात याचेंहि कारण हेंच. त्यांच्या स्वरानुसार भावगीत म्हणतांना कुठें धडधड नाहीं, धडपड नाहीं, कसरत नाहीं कीं विद्वत्तेचें प्रदर्शन नाहीं; अगदीं जसा भाव संथ वा चपल तसे स्वर; जसें भावाचें वातावरण, तसेंच स्वरांचें

आंदोलन वा आलाप. यामुळें वागर्थाच्या प्रतिपत्तीप्रमाणेंच वागर्थ व स्वर याच्या एकजीवतेची प्रतिपत्ति होते व श्रोत्याच्या ठिकाणीं साक्षात् रस निर्माण होऊन त्याच्या आनंदावर तो पोहत, तरंगत राहतो; भावगीत गाऊन किंवा म्हणून सपलें तरी तो त्यावर तरंगत राहतो.

याचें खरें कारण असें आहे कीं तो नुसते शब्द किंवा नुसते स्वर ऐकत नाहीं. स्वरमार्गें भावाची प्रतीति होते व ती झटकन होते हें तर खरेंच; पण याहीपेक्षां विशेष म्हणजे कवीनें भावनेतून व गायकानें स्वरांतून ज्या जीवनाची अनुभूति घेतलेली असते तिचा रसिक हा संमिश्र म्हणजे दुप्पट उत्कटतेनें अनुभव घेतो. हा जीवनांतील पुनःप्रत्यय असतो; पण त्यामुळें आनंदलाभ करून देणारी वाक्, अर्थ, भाव व स्वर ही धन्य आहेत, असें कोण म्हणणार नाहीं ?

अगदीं प्राचीन कालापासून सर्व ललितकलांत काव्याला पहिलें स्थान दिलें गेलेलें आहेत. पण आधुनिक कालांत मात्र हा प्रश्न विवाद्य ठरून ते स्थान संगीताला दिलें जातें. संगीताला हें स्थान देतांना असे म्हटलें जातें कीं संगीताला मूलतः शब्दांची देखील जरुरी नसते. नुसता स्वरमेळ, किंवा एकादा आलाप वा एकादी लकेर निःशब्द स्थितीत नुसती हवेंत तरंगली, तरी ती आपलें मन वेधून घेते व आपल्या झंकारांनीं मनांत तो तो भाव निर्माण करते. संगीताला कुणी कोणतेंहि स्थान दिले, तरी अनुभवांती हें खरें वाटतें. सुखदुःखांच्या निरनिराळ्या वृत्ती आपल्या मनात निर्माण झाल्यावर, आपण देखील आपल्याशीं निशब्द स्वर, आलाप वा लकेरी घेऊन गुणगुणूं लागतों; आणि त्या आपल्या अंतर्वृत्तींच्या निश्चित द्योतक असतात. ही जर रोजच्या अनुभवांतील स्थिति, तर मग भावगीताला विशेषतः गेय भावगीताला स्वर कां नकोत ? हा उल्लेख, स्वरानीं काव्यावर अतिक्रमण करावे, यासाठीं केलेला नसून, स्वरांचें महत्त्व काय व किती आहे व चांगल्या भावगीतांतील काव्याचा म्हणजेच रसाचा संपूर्ण आविष्कार होण्यास स्वर कसे

उपयोगी पडतात किंवा त्या त्या भावनेंत झटकन शिरण्यास स्वर ही कशी अगदीं जवळची वाट आहे, याचें दिग्दर्शन होण्यासाठीं केला आहे. फुला-मधें जें रंगाचें ( वा विविध रंगांच्या मिश्रणाचें ) किंवा सुगंधाचें महत्त्व, तेंच भावगीतामधें स्वराचें आहे, हाच याचा इत्यर्थ

काव्यांतील रसाचा आविष्कार होण्यास जेवढी भाववाचनाची जरुरी असते, तेवढीच किंवा जवळ जवळ तितकीच, त्याच्या संपूर्ण आविष्कारास स्वरांची जरुरी असते; आणि नाहीं तरी भाववाचनाला स्वर लागत नाहींत का ? भाववाचन करताना स्वराचें उंचनीच आंदोलन वा उच्चारण होत असतेंच. त्यांत गेय गीतांना फक्त संगीतानुकूल शास्त्रशुद्ध अचुक स्वरांची जोड द्यावयाची; ती देण्यानें सौंदर्यप्रतीति होण्यास मदतच होईल यांत शंका नाहीं.

एवढ्या विवेचनानंतर सौ. संजीवनींच्या ' भावपुष्पा ' कडे पाहिल्यास काय दिसतें ? भावपुष्पांतील सर्वच भावगीतें गेय आहेत, व त्यांत त्यांनीं विविध स्वरांचा सुगंध निर्माण करून तीं जनतेपुढें वेळोवेळीं मांडलीं आहेत. यापैकीं कांहीं तर पूर्वींच्या संग्रहांत आलेलीं असून त्यांचें रसग्रहणहि झालेलें आहे. तथापि चांगल्या गोष्टींची पुनरुक्ति ही केव्हांहि सुखदायकच वाटते. त्या दृष्टीनें ' संधिकाल ', ' मधुमास ', ' शांत सागरीं ' या सारख्या कविता येथेंहि स्वागतार्ह आहेत. सौ. संजीवनींचा आवाज भावकोमल असून त्यांच्या म्हणण्यांतील ढंग सुंदर, आकर्षक व भावनानुकूल असल्यानें यांतील भावगीतें, प्रार्थना, भजनें वा गौळणी ऐकतांना मन तल्लीन होतें. मूळच्या भावगीतांत जर भाव नसता तर संगीताचा स्पर्श होऊनहि तीं नीरसच वाटलीं असतीं, किंवा तीं नुसती मनाशीं वाचलींच असतीं, तर त्यांत संगीताची किमया अनु-भवास आली नसती. पण भावगीतें व भावसंगीत या दोन्हींच्या मधुर संगमा-मुळें यांत समसमां संयोग झाल्यासारखा वाटतो. आणि गेय भावगीतांत नेमकें हेंच साध्य साधावयाचें असतें.

—

सौ. संजीवनी यांनीं आपल्या "शांत सागरीं कशास उठविलीस वादळें" या करुणरम्य भावगीतानें व त्यांच्या आर्तकोमल स्वरानें सबंध महाराष्ट्राचें लक्ष आपल्याकडे वेधलें आहे. त्यांचें हें गीत ऐकतांना मन पर्युत्सुक होतें व जन्मांतरींच्या कसल्यातरी अबोध सौहृदावर मन तरंगूं लागतें. त्यांतील शद्ब शद्ब व स्वर स्वर आपल्याला झपाटतो. याला ज्याप्रमाणें भावगीताचे भाव व स्वर कारणीभूत आहेत, त्याचप्रमाणें सौ. संजीवनीचें व्यक्तिमत्वहि आहे. सौ. संजीवनीची भावशील वृत्ति, त्यांचें मोकळें बोलणें, त्याचा निर्मळ खेळकरपणा किंवा त्यांचें हसरें चापल्य या सर्वांचें प्रतिबिंब त्यांच्या कवितेंत पडलें आहे.

पूर्वीच्या संग्रहापेक्षां 'भावपुष्पांचें' वैशिष्ट्य कांहीं वेगळें आहे. एक-तर या संग्रहांत सर्व गेय गीतें एकत्र केलेलीं आहेत. सौ. संजीवनी म्हणतात कीं "मीं गाण्याला कांहीं शद्ब असावेत म्हणून हीं गीतें लिहिलीं आहेत." परंतु मला हें म्हणणें खरें वाटत नाहीं. तो त्यांचा विनय आहे. कै. माधव-राव पटवर्धन देखील म्हणत, कीं 'गज्जलांजलींतील' गज्जल हे मी छंदोरच-नेंतील गज्जलांचीं उदाहरणें म्हणून लिहिले आहेत.' परंतु त्यांतील बहुतेक गज्जल हीं उत्कृष्ट भावगीतें असून माधवरावांच्या काव्यात्म जीवनाची व व्यक्तिमत्वाची नस नस दाखविणारे आहेत सौ. संजीवनींच्या गीतांचेंहि असेंच आहे. यांपैकीं कांहीं गीतें वा पदें त्यांनीं स्वराला शद्ब हवेत म्हणून लिहिलीं आहेत, हें जरी क्षणभर खरें मानलें, तरी बरीचशीं गीतें केवळ स्वरासाठीं जन्माला आलेलीं नसून, प्रथम तीं भावरूपानें मनांत जन्मलीं व नंतर अभिव्यक्तीच्या वेळीं शद्बस्वरांतून पाझरून कागदावर अवतरलीं.

या 'भावपुष्पां'च्या राशी करावयाच्या म्हटल्या तर सर्वांत मोठी रास 'विरहगीतांची' होते; त्याच्या खालोखाल 'मीलनगीतांची' रास होईल आणि त्याच्या खालोखाल राष्ट्रीय गीतें, गौळणी, भजनें, प्रार्थनागीतें, निसर्ग-गीतें व मंगल संस्कार करणारीं गीतें यांच्या लहान लहान राशी होतील. भाषा व

रचना या दृष्टीनें हीं भावगीतें सफाईदार, नादमधुर व ठशठशीत आहेत. ‘ प्रिय प्राणाहुनि ’ यातील देशाभिमान, ‘ बापू तुमच्या ज्योतिनें ’ यातील राष्ट्रीयता, ‘ म्हणत्ये राधे ’ किंवा ‘ साजणि बाइ ग ’ यांतील गोळणीचा भाव, ‘ गोविंद गोविंद ’ तुजविण रे ’ किंवा ‘ ब्रिजलाला रे ’ यांतील भक्तिभाव, ‘ आज दिवाळीला आला माझा भाऊराया ! ’ किंवा ‘ प्रेमाची प्रतिपदा ’ यांतून उचंबळणारे मंगल संस्कार, ‘ शिवशंकरा ! ’ ही ‘ शंकरा ’ रागांतील गंभीर प्रार्थना किंवा ‘ रात्र ’ ‘ पांखरा जा ’. किंवा ‘ संध्ये ’ यातील निसर्ग-सृष्टी हीं मन वेधून घेतात.

‘ मीलनगीतें ’ संख्येनें व गुणानें यापेक्षां जरा अधिक व सरस आहेत. त्यांत ‘ जिवाची अनुपम जोड, नाजुक वेल्हाळीचा आनंद, दोन जिवाना अभिमंत्रित करणारी मीलनवेला, चोरट्या भेटीचें गुपित, आसवांचा भरलेला पेला वा पौर्णिमेच्या चांदण्याचा नितळ प्रकाश ’ ही प्रफुल्लतेनें नादत आहेत. पण या गीतात ‘ विरहगीताचा गोडवा तितकासा नाहीं.

सौ. संजीवनींचें मन खरें खरें रमतें विरहगीतांत. विरहगीतांत त्यांच्या भावना कमालीच्या उचंबळून येतात व त्या बहारदार काव्य रेखाटतात. त्यांचें खरें सामर्थ्य विरहगीतांत आहे. या विरहांत जितकी विविधता तितकाच नाजुक भावहि आहे. यांत प्रियकराला जिवाला रमविण्यासाठीं येण्याचें आवाहन आहे, निघून जावयाचें असेल तर प्राण पदतलीं चुरडून मग जाण्याची विनवणी आहे, मनकमलाचें समर्पण आहे, स्मरणानें जिवाला येणारी धुंदी आहे, एकांतांत ऐकूं येणारी हाक आहे, अनुरागांत आळविलेली प्रीतीची गाथा आहे, चंद्राच्या दर्शनानें पालविणारे नवजीवन आहे, राजसाचा रुसवा आहे, प्रीतीची रीत पुसणारा सवाल आहे, जीवनाचें भंगलेलें स्वप्न आहे; मोगरीचे सुकलेले बहर आहेत, मोहपाशांत गुंतलेले प्राण आहेत, प्रीतीच्या नादानें झालेलें हंसें आहे, वाट पाहून मावळलेले दिन आहेत, प्रेममय भाव-

नेनें आपल्याला ओढून नेण्याची विनवणी आहे, शांत सागरांत उठलेलीं वादळें आहेत, भावमंदिरांत तेवत असलेली प्रीतीची सुप्रशांत ज्योत आहे, स्वप्नांचा मधुमास आहे, अंधारांत दडलेलीं स्मितें संधिकालीं लुटण्याची विनंति आहे' किंवा 'प्रतीक्षापूर्तीच्या वेळीं उडालेली गोड तारांबळहि' आहे. विरहांतील हे सर्व भाव एका विरहणीचे असून ते काव्यात्मवृत्तीच्या स्त्रीसुलभ स्वभावाला शोभणारे आहेत. त्यांत भावकोमलता असून आर्तता आहे, व साधेपणा असून रसिकता आहे. स्त्रियांनीं रेखाटलेल्या आजवरच्या स्त्रीजीवनांतच काय, पण पुरुषांनीं रेखाटलेल्या स्त्रीजीवनांतहि इतकें विविध स्वभावांचें चित्रण दुर्मिळ आहे.

या भावपुष्पां'तील कालांतरानें जरी कांहीं कोमेजलीं, किंवा कांहीं केवळ स्वरसुगंधानें दरवळून राहिलीं, तरी 'मीलनगीतें' व 'विरहगीतें' मात्र आपल्या सर्वांगीण गुणांनीं बकुळीच्या फुलांप्रमाणें चिरकाल सुगंध देत राहतील. आज एकीकडे 'नवकाव्य' निर्माण होत असतां, दुसरीकडे ही सुंदर 'भावपुष्पें' उमलावीं ही मराठी कवितेच्या सर्वांगीण समृद्धीची साक्ष आहे व संगीताच्या मराठीकरणाच्या मार्गावरील तर ती सुंदर पखरणच आहे.

४ फेब्रुवारी १९५१.
विश्रामबाग, सांगली.

**गिरीश**

# अनुक्रमणिका.



१

मनांत आलें तेंचि गाइलें
मज न कुणाचें भान राहिलें.

किरण रवीचे, गंध फुलांचे
रंग मनोहर दिशादेशांचे
नाजुक नर्तन जललहरींचें

या सकलांनीं मजसि मोहिलें.
मज न कुणाचें भान राहिलें.

सुरेल सुमधुर कंठ नसोनी
अवगत नसतां रागरागिणी
गुंगत विहरत जनीं, निर्जनीं

गीत भाबडें रचुनि पाहिलें
मज न कुणाचें भान राहिलें

रिझवित मृदु हृदयें रसिकांचीं
स्नेह पिपासा शमवित मनिंची
वेल वाढवुनि उरिं सु-रसाची

'भावपुष्प' मी जगा वाहिलें
मज न कुणाचें भान राहिलें.

वैष्णवजन त्यालाचि म्हणावें
जो परपीडा जाणी रे
परोपकारीं जीवित वेंची
मनि अभिमान न आणी रे
सकलांमाजी राही वंदी
निंदा न करि कुणाची रे
काय वाच मन निश्चल राखी
जननी धन्य तयाची रे
तृष्णा त्यागी, धरि समदृष्टी
मातेपरि परनारी रे
असत्य वाणी कधि ना बोले
परधन हातीं न धरी रे
माया-मोहीं मुळिं न गवसला
चित्तीं पूर्ण विरागी रे
रामनामिं जो घेइ समाधी
तीर्थें ज्याच्या शरिरीं रे
लोभ मोह मद मत्सर त्यागी
काम क्रोध निवारी रे
'नरसिंह' म्हणे दर्शन त्याचें
शरणार्थी जन तारी रे
वैष्णवजन त्यालाचि म्हणावें
जो परपीडा जाणी रे

(चाल: सोये हुये है
चांद और तारे)

३

माझ्या प्रीतिची रे ज्योत

तुझ्या भावमंदिरांत
तेवे सुप्रशांत
माझ्या प्रीतिची रे ज्योत.

ज्योत माझी झवलीशी
नाशी तिमिराच्या राशी
थरथरे, स्थिरे, फिरे
गुंग नर्तनांत !—

दीपा ! तुझ्या अंतरांत
स्नेहभावें लाविलीस
कवळोनी धरितोस
नित्य अंतरांत !—

तुझ्या स्वप्नीं तरळेल
तुझ्या पथीं प्रकाशेल
तुझ्या संगें ही पावेल
लय अनंतांत !—

माझ्या प्रीतिची रे ज्योत.

## ४

मनकमल तुला मी वाहिलें.

भान हरपुनी प्राणसख्या
निमिषांत तुझी मी जाहलें.
मनकमल तुला मी वाहिलें.

उमलुनि आल्या भावभावना, शमल्या चिरवेदना
नवरंगांनीं नटल्या सजल्या अंतरिंच्या कामना

त्या अभिनव उन्मेषाचें
मधु गीत तुला मी गायिलें.

विझवाया मम अंतर्ज्योती घन आले अंबरीं
मज हटवाया वादळवारा सजला कितिदां तरी

ध्रुवताऱ्यापरि अढळपणें
तव चरणीं सख्या मी राहिलें.

मनकमल तुला मी वाहिलें.

( भोलकगीत )

# ५

अंबरांत नाजुकशी चंद्रकोर हांसे
मंदिरांत कां ग सखे सोडिसी उसासे ?

कुस्करुनी टाकिलीस माळ ही कळ्यांची
चालविली उघडझांप नेत्रपाकळ्यांची
मोकळाच केशपाश वसन तुझें साधें,
कां धरिसी हरिवरती मधु रुसवा राधे ?
अंबरांत नाजुकशी चंद्रकोर हांसे

कंसदमन करण्या हरि मथुरेला गेला
येइल परतूनि खचित घेउनि जयमाला
रथ दारीं राहि उभा, कोण गे तयांत ?
आण गडे पंचारति, आले यदुनाथ
आले यदुनाथ सखे आले यदुनाथ

प्रणयसागरावरती रमणिहृदय नाचें
अंबरांत नाजुकशी चंद्रकोर हांसे.

आला स्वप्नांचा मधुमास
उमलवीत उरिंचा उल्हास.

निद्रेच्या भूमीवर फुलल्या
स्वप्नसुमांच्या कळ्या कोवळ्या
मूक मनीषा अंतरांतल्या
उधळिती स्वैर सुवास

ही नटवी प्रीतीची कलिका
घडि घडि दावी अनंत रूपा
धुंद करी अर्पुनि मनमधुपा
अद्भुत प्रणयविलास ...

टवटवलीं मृदु शैशवसुमनें
लेवुनि तें मधुमंगल लेणें
अनिर्बंध मन गुंगत गाणें
भोगी छंदसुखास ...

जागृतींत जें जें वांछियलें
तें तें या स्वप्नभूमधिं रुजलें
रसरंगें अंतर्जग नटलें
नाचत जीवन रास ...
आला स्वप्नांचा मधुमास.

प्रेमभरें हंसतमुखें मजसंगें चल सजणी।
मधुरस्वरें गीत तुझें गाउनि जा मनरमणी.
दरवळला कुसुमगंध
शांत शांत विहगवृंद
करित मानसास धुंद चारु निशा ये भुवनीं.
लाजत कर धेसि करीं
संवेदन गोड उरीं
प्रीतीची नवमाधुरि पाहूं दे तव नयनीं
गालीं तव अश्रुसरी
मंदस्मित मधुअधरीं
लज्जाकुल मनिचें गुज बोलुनि जा मनरमणी।
प्रेमभरें हंसतमुखें मजसंगें चल सजणी.

( भैरवी )

## ८

मज सांग कशानें मावळले तव अधरावरलें हंसूं ?
सांग कशानें ओघळले तव नयनांमधुनी आंसूं ?

नदितटीं फुलांचा कुंज बहरला जिथें
जललहरी करिती मंजुळ कलरव जिथें
तिथेंच आपण हांसत खेळत हितगुज बोलत बसूं

थरथरति कोवळ्या तुझ्या अधरपाकळ्या
तरळती मुखावर तरल भाव साउल्या
उकल मनींचें गूज, नको ग अशि मजवरती रुसूं.

हा इथें लतेला तरुवर बघ बिलगला
हा जलवंतीवर चंद्र दिसे लोभला
कां कधिंकाळीं आपण दोघें असेच शोभुन दिसूं ?

मज सांग कशानें मावळलें तव अधरावरलें हंसूं ?

१

प्रीतिची ही रीत कां रे
प्रीतिची ही रीत कां ?

वाट मी पाहूं किती
सखया तुला ध्याऊं किती
शिणुनि गेलीं लोचनें ही
मंद झाली दीपिका रे.

घुमतसे कानीं अजूनी
ती तुझी प्रेमार्त वाणी
रुळतसे कंठीं अजूनी
तूं दिलेली मालिका रे.

प्रेमला, ये वायुवेगें
राहुंया दिनरात्र संगें
जीवनाला उजळणारा
चंद्र तूं — मी चंद्रिका रे

प्रीतिची ही रीत कां ?

घरदारांहुनि प्रिय प्राणांहुनि अम्हांस अपुला देश
दिला तयानें अम्हांस सुंदर सेवेचा गणवेश
अमुच्या कानीं थोरांचे घुमती मंगल बोल
अमुच्या ध्यानीं शूरांची परंपरा बहुमोल
संकटकालीं प्रभु परमात्मा देइ अम्हां आदेश
घरदारांहुनि—

जाळ भडकतां वैराचा अम्ही तिथें जाऊं
शांतीची अन् प्रेमाची ध्वजा तिथें लावूं
नसानसांतुनि अमुच्या खेळे ध्येयाचा आवेश
घरदारांहुनि—

धरणीवर नांदेल अतां स्वतंत्र भारतखंड
भारतांत सद्धर्माची ज्योत जळेल अखंड
ती स्फूर्तीचे जगा दाखविल नित्य नवे उन्मेष
घरदारांहुनि प्रिय प्राणांहुनि अम्हांस अपुला देश

## ११

प्रीतिचा निजांतरांत दीप लाविला
मूर्ति तुझी उजळिन हा भाव ठेविला

मावळले रविचे कर
ये भुवनीं अंधकार
मंदिरांतला प्रकाश सर्व लोपला.

वेचुनियां स्मितसुमनें
हार रचुनि कुशलपणें
सारुनि निर्माल्य दूर तुजसि वाहिला.

सुगुणांचें संमार्जन
नवभावांचें तोरण
शृंगारिन जगजीवन, ध्यास घेतला.

मनमंदिरिं वास तुझा
चल अचलीं भास तुझा
तुजविण मी मोक्ष दुजा जगिं न पाहिला
प्रीतिचा निजान्तरांत दीप लाविला.

# १२

मुरलिधरा घे मुरलि करांमधिं
ये जगदीशा, नांदायातें
मम हृदयांच्या गोकुळामधिं.

मलिन जाहलें यमुनेचें जळ
स्वैर विखुरलें गोधन चंचळ
तुझ्या वियोगें स्थिरचर व्याकुळ

देइ चेतना, लावि न अवधि

तव मुरलीची तान मुकुंदा
नेइल विलया उरिंची बाधा
येइन चरणीं बनुनी राधा

ध्याया सुंदर भावसमाधी,
मुरलिधरा घे मुरलि करांमधिं.

(खमाज)

## १३

माझ्या कानीं तुझी हांक रे
मनीं प्रीतिची आणभाक रे.

वरि तिमिराचें राज्य पसरलें
जग सारें निद्रांकित झालें
स्वप्नपांखरूं सुरेल बोलें
गीतलकेरी लाख लाख रे.

जीवनसर भरलें अनुरागें
जिवाजिवांचे जुळवित धागे
' जवळिं जवळिं मम येइ जिवलगे '
आळवि सखिला चक्रवाक रे.

हें द्वैताचें सारुनि अंतर
तुजजवळी मी येइन सत्वर
तुला मला लाभेल निरंतर
नंदनवनिंचें स्वर्गसौख्य रे
माझ्या कानीं तुझी हांक रे.

# १४

वाट चालतें अतां पथांत मीच एकली !

एकलीच चालतां
भेटला मला सखा
मधुर हांक ऐकुनी तयास साद मी दिली.

घेउनि हातांत हात
दाविन रमणीय वाट
मोहवून तनमनास मजसि भूल घातली.

संगतिचें मधुरामृत
मजवरि सिंचुनि अविरत
भूवरिंच्या स्वर्गाची सीमा मज दाविली.

एक भान एक प्राण
एक तान एक गान
नकळत मनवीणेची तार तार उतरली.

स्वरसंगम विसकटला
कोलाहल उरिं उठला
तटतटले भावबंध, विफलताच दाटली.

वाट चालतें अतां पथांत मीच एकली.

या घरची झालीस स्वामिनी
मंजुभाषिणी हे सुहासिनी

पाहून घराची ही एकाकी कळा
बघ उदास होतो वास्तुदेव येथला
तूं लाव तयाला सौभाग्याचा टिळा
सुन्या घरांतुन नव्या सुखाचे
घुमवी हास्यध्वनी

ही गुढी डोलते, तोरण आंदोलतें
ही स्नेहभरानें पवळी हुंकारते
हें पुष्करणीचें पाणी हेलावतें
तुझ्या पदांनीं भाग्य येतसें
आंत उंबऱ्यांतुनी

सोडवूं बंधनें परंपरांची जुनीं
जीवनीं करूंया नवतेची मांडणी
त्यागुंया, भोगुंया रमुंया सहजीवनीं
तेवत ठेवूं आर्यत्वाची
ज्योत चिरंजीविनी
या घरची झालीस स्वामिनी.

( काफी )

# १६

जीवनाचें स्वप्न माझें भंगलें, गेलें लयाला
ही जिवाला जाळणारी आठवण उरली कशाला ?

नाचली जळवंति मोदें
चंद्रदेवा पाहण्याला
गर्द अंधारीं तियेची याचना विरली कशाला ?

अंगणीं फुलत्या फुलांचा
सुबक झेला गुंफियेला
चुरडला, आतां दिगंतीं गंध हा भरला कशाला ?

रौरवीं निष्प्रीतिच्या या
लोटुनी हंसऱ्या जिवाला
आसवांचा भरुनि पेला, रात्र ही सरली कशाला ?
ही जिवाला जाळणारी आठवण उरली कशाला ?

( भरवी )

स्वातंत्र्याचा सालगिरा हा
करूं साजरा हर्षभरें

भरतभूमिच्या पदीं भक्तिची वाहुं अंजली
कोटिकरें

आभाळांतुनि जलधारांनों झरझर उतरा भूमितलीं
भरतभूमिच्या अंगणामधें करुनि जा सडा रांगोळी
कल्पतरूंच्या कुसुमांनों या भूमीवरती ओघळुनी
भरतभूमिच्या दारीं सुंदर तोरण द्याहो लटकवुनी
ये सूर्या, ये चंद्रा तूंही तिच्या मंदिरीं झळकाया
भाग्यसंपदा तिची अमोलिक जगा नको कां दावाया ?
सरसावुनि या वीणा अपुल्या गंधर्वांनों नभांतुनी
यशोगान गाऊन तियेचें मुग्ध करा सारी अवनी
श्री सरस्वती जिच्या संगतीं अक्षय नांदति मोदभरें
तिच्या पदांवर भावभक्तिची वाहुं अंजली कोटिकरें

हृदयांतरिं ना तुजलागिं निवारा
पांखरा जा सुखें विहर तूं दिगंतरा

फलभार मधुर ना इथें तुला सेवाया
झुळझूळ झऱ्याची कधिं ना येइल श्रवणिं तुझ्या
हें उजाड सारें निर्जन जीवन – जा –
पांखरा – जा

कंठांत उमटते ध्येयाची ललकारी
पंखांत उसळतें आशा गगनाची गहिरी
खुणवितात तारे – वारे – तुझे सोयरे – जा
पांखरा – जा

धगधगली होळी संकल्पांची येथें
हें विकारवादळ तिजला चेतविण्यां बघतें
जा उंच वितानीं उडुनी, चित्तचकोरा ! – जा
पांखरा जा सुखें विहर तूं दिगंतरा !

( चाल: जा मुली जा – )

मंजु गायनांत तुझ्या हृदय रंगलें
तव ठायीं लीन जीव स्नेहभंगलें·

अंतरांत लक्षभाव निमिषिं उसळलें
त्यामधुनी गोड तुझें रूप बिंबलें,

चराचरावरि मोहन दिव्य पसरलें
सत्य उदित होत स्वप्नपाश भंगले,

मोहरले जीवभाव प्राण तोषले
विश्व सूरसागरांत डोलुं लागलें

मंजु गायनांत तुझ्या हृदय रंगलें.

( यमन )

# २०

श्रांत मी इथं
श्रांत तूं तिथं
तळमळतों तूं नि मी सख्या इथें तिथें

अविरत सुमगंध इथें
वायुलहर मंद इथें
विरहपंजरांत परी मन उदास नांदतें.

तुज अपार श्रमजीवन
एकाकीपण दारुण
चिरव्याकुल प्रणयगान तुजासि तिथें छेडितें

सरल्यावर दुर्दिन हे
मीलित- हंसतिल हृदयें
चुकतिल मग काळाचीं कृष्णकुटिल भाकितें

श्रांत मी इथें
श्रांत तूं तिथें
तळमळतों तूं नि मी सख्या इथं तिथें.

( बागेश्री )

# २१

उदयाचालें रवि आला
उजळित दाहि दिशांला.

सुवर्णरंजित प्रभा उषेची
भ्रांति निवारी जननयनींची
मंद नर्तनें शीत वायुचीं
मोहवितीं जगताला !

मधुर मंत्र सत्याचा गुंगत
आलें नवयुग हांसत नाचत
त्वरित मानवा ! होउनि जागृत
आळवि नवकवनाला !

# २२

या भरल्या अंधारीं राहूं कुठवर मी एकटी ?
कशी सोडवूं जिवाभंवतिची काळोखाची मिठी ?

आकाशांतुन निखळुनि नेल्या कुणी तारका दूर ?
कुणी कोंडिला अंतरांतला गोड सुखाचा सूर ?
माझ्यापासुनि कुणि तेजाची केली ताटातुटी ?
या भरल्या अंधारीं राहूं कुठवर मी एकटी ?

स्तंभावरची ज्योत दिव्याची कुणी कशी विझविली ?
काळया रातीं झंजावातीं नाव कुणी लोटिली ?
कोण तियेला उडी घालुनी तारणार संकटीं ?
या भरल्या अंधारीं राहूं कुठवर मी एकटी ?

( फिल्म साखरपुडा )

# २३

सदा फुलांच्या मधुनि मधुकरा
गुंगत तूं होतास !

कळ्याफुलांवर रचुनी गाणीं
ऐकविलीं तूं मंजु रवांनीं
प्रफुल्लतेच्या झोल्यावर
आंदोलत तूं होतास !

लक्षदलांची प्रीतकमलिनी
वाहियली मी तुझिया चरणीं
मधुगंधित स्पंदनीं तियेच्या
रंगत तूं होतास !

मरंद सरला, भावहि सरला
तुझा मधुकरा छंद न सुटला
परागकण विखुरल्या स्मृतींचे
चुंबित तूं होतास

सदा फुलांच्या मधुनि मधुकरा !
गुंगत तूं होतास.

## २४

जीवाच्या जिवलगा नंदलाला रे
नंदलाला रे.

यमुनेंत तुझ्यामाझ्या बिंब मुखांचें
बांसरींत तुझ्यामाझ्या गीत सुखाचें
स्मरणानें जीव माझा धुंद झाला रे
नंदलाला रे.

चांदण्यांची नित्य नवी रासलीला रे
पांखरांच्या गळां नवी गीतमाला रे
कमलदळांत नवा गंध आला रे
नंदलाला रे.

माझ्या कानीं ओळखीचा साद आला रे
प्रभू तुझ्या पावलांचा नाद झाला रे
धावलें मी तुझ्या पदवंदनाला रे
नंदलाला रे.

ये जिवा रमवाया
फुलवित भावफुलांच्या माला
पसरित शीतल छाया

येउनिया चंदेरी रात्रीं मज धरिलें करपाशीं
स्वप्न सुखाचें दावुनि मजला कुठें जिवलगा जासी ?
लोटियला मम जीव सुखाचा कां विरहानलिं वाया ?
ये जिवा रमवाया

तुझ्यावांचुनी दुनिया सारी सुनी जहाली आज
तुझ्यावांचुनी मधुहास्याचा सुकला सुंदर साज
ध्यास तुझा अनुदिन मनिं वागे, लागे धीर सुटाया
ये जिवा रमवाया

नयनांमधले आंसू सरले, विरले बोल मनींचे
सरलें आयू, हताश हृदयीं भरले घन चिंतेचे
साहुं कशी या विरहव्यथेला, किति शिणविसि
मज राया

ये जिवा रमवाया

चाल : टूट गई मनवीना

# २६

गाइन तव गुणगान दयामय
नितान्तमंजुल
गाइन तव गुणगान

मी अधीर, भयकंपित शिशु तव
तूं गिरिधारि महान

नाहिं जिवाला अन्य विसावा
तव चरणाविण जाण

त्वन्मय करुनि घे मन्मना, मोहना
दे मज शुभवरदान

जेंवि मधुवनीं भ्रमर निशिदिनीं
अविरत हो रममाण

तेंवि प्रभो तव गुणसंकीर्तनिं
हरपत तनुमन भान

गाइन तव गुणगान

( चाल: बोल सख्या मधुबोल. )

## २७

जायचें असेल जरी ... नकळतां निघून जा !
न कळतां निघून जा !!

फूल फूल हुंगितां
चांदण्यांत गुंगतां
देहभान हरपतां खुशाल मजपुढून जा !

केशपाश सोडुनी
त्यांत वदन झाकुनीं
रुसुनि बैसतें तदा लपत छपत दूर जा !

गान गायिल्यावरी
बीन सारुनी दुरी
थकुनि नयन झाकितें त्या क्षणीं उठून जा !

क्षणिक जायचें असें
लागु दे तुला पिसें
विरहिं मीलनीं सुखें मजासि गुंगवून जा !

आणि जर अखेरचें
तुज असेल जायचें
जात जात पदतलीं प्राण हे चुरून जा !

जायचें असेल तरी नकळतां निघून जा !

## २८

आकाशवाणिमधुनी घुमतां उभ्या जगांत
मी ऐकिलें दुरूनी माझेंचि भावगीत.
सर्वस्व ओतिलें मी एकदां जयांत
तें ऐकिलें दुरूनी माझेंचि भावगीत.

तुजवीण प्राण माझे दिनरात्र कांठें यावे
कधिं भेट व्हावयाची तें मज ठाउकें नसावें
परि जीव हा भुकेला तुझियाकडेचि धावे
हें गीत गात नाथा रूपीं तुझ्या विसावे
या आर्त भावनेनें तुज वाहिलें जयांत
तें ऐकिलें पुन्हां मी माझेंचि भावगीत

गेली सख्या अतां रे ती वेदना सरोनी
पडले निवान्त देहीं मम प्राणही थकोनी
स्वर ते मुके जहाले, विसरून शब्द गेले
वाणी मिटून गेली, ते भावही निमाले
ध्वनिमुद्रिकेवरी तें परि गीत ऐकितांच
भडका उडून गेला क्षणमात्र अंतरांत
क्षण एक जीवघेणी झाली सजीव प्रीत
मी ऐकितां दुरूनी माझेंचि भावगीत.

२१

प्रतीपदा प्रेमाची पहिली
दीपावलिनें आज उजळली
स्नेहज्योत अपुली

तुझ्या नि माझ्या जगतीं राया
अवचित आलें भाग्य वसाया
शिरीं आपुल्या मंगल छाया
प्रणयानें धरिली
प्रतिपदा प्रेमाची पहिली

हृदयमंदिरांत आज हो विराजमान सख्या
तुजला मी ऐकवीन अंतरिंचें गान सख्या
नजराणा प्राणांचा वाहिन
मी तव पदकमलीं
प्रतिपदा प्रेमाची पहिली

( भीमपलास )

# ३०

हांसेना बोलेना कां ग मुळीं
माझ्या जिवाची ही सोनसळी
चिंता मनीं माझ्या भारावली
कां ग फुलेना ही चांफेकळी.

चुंबनीं सुखगंध दरवळला
ममतेचा पाऊस खळबळला
सकलांच्या नयनींची ही बाहुली
हांसेना बोलेना कां ग मुळीं ?

चंद्रा, हिच्या नेत्रिं कांती तुझी
वदनीं हिच्या वाणि भृंगा तुझी
मूर्ति मिळेना ग अशि देउळीं !
कां ग फुलेना ही चाफेकळी ?

कुरवंडी प्राणांची कां ग करूं?
सुखवूं कसें बाई हें लेकरूं?
देवा, हिच्या शिरीं तव साउली
सांभाळी माझी ही सोनसळी.

( चाल: अंगणांत फुलल्या जाई जुई )

## ३१

क्षणहि तुझा मज विसर पडेना
हातुनि कांहीं काज घडेना.

जिथें तुजसवें झगमगला दिन
अंधकार बघ तेथें दारुण
जीवनपथ मम जाइ झांकळुन
अणुहि पुढें हें पद उचलेना
क्षणहि तुझा मज विसर पडेना.

समयिं सुखाच्या वा दुःखाच्या
स्पर्शीं अपुल्या मृदु अंगुलिच्या
दिव्य दिलासा दिलास त्याच्या
चिंतनांतुनी चित्त उठेना
क्षणहि तुझा मज विसर पडेना

प्रभु तुजविण मी कवणा ध्यावें
अनुदिन हें मन वण वण धावें
तुझ्याच ठायीं मात्र विसावें
अन्य कुठें हा जीव जडेना
क्षणहि तुझा मज विसर पडेना.

( पहाडी )

## ३२

गुपित् ठेवायचं अपुलं तुझ्यामाझ्यांत
नाहीं बोलायचं, नाहीं सांगायचं,
नाहीं करायची कुजबुज कानाकानांत
गुपित् ठेवायचं अपुलं तुझ्यामाझ्यांत.
दृष्टि साऱ्यांची चुकवुन येऊं
सख्या आंबेराईमाधिं चल जाऊं
वारा झुळझुळ वाहील
कोयल साथ करील
बोल विरतिल अपुले पानापानांत
सख्या पानापानांत.
दृष्टि साऱ्यांची चुकवुन येऊं
सख्या नदीकिनारिं चल जाऊं
पाणी झुळझुळ वाहील
वल्हं साथ करील
होडी हाकारूं पैलतटिं नादानादांत
सख्या नादानादांत
मार्गशीर्षाचा महिना आल्यावरी
वडिलधाऱ्यांना सांगुं अपुलि प्रीत न्यारी
मोठ्या थाटामाटांत
लगिन् होइल गावांत
राजाराणी मिरवुं मग साऱ्या जनांत
सख्या साऱ्या जनात
गुपित् ठेवायचं अपुलं तुझ्यामाझ्यांत

## ३२

फुलमाळ गळ्यांतिल मी तुझिया
दुरि सारुं नको मज, दावि दया.

तव सुगुणांचा गंध मनोहर
निशिदिनिं माझें व्यापिल अंतर
तुझ्या यशाचा रंग रुचिरतर
खुलविल नित माझ्या हृदया
फुलमाळ गळ्यांतिल मी तुझिया.

तव हृदयाचें मंगल मंदिर
वास तिथें मम असो निरंतर
तुझ्या प्रीतिची प्रभा शुभंकर
मी - तूं - पण नेइल विलया
फुलमाळ गळ्यांतिल मी तुझिया.

# ३४

शांत सागरीं कशास उठविलींस वादळें
गायिलें तुवा कशास गीत मन्मनांतलें ?

काय हें तुझ्यामुळें
देहभान हरपलें
युगसमान भासतात आज नाचरीं पळें.

अमृतमधुर बोल एक
श्रवणिं जों न पाडिलास
अधिरता भरे जिवांत केवढी तयामुळें.

स्वर्ग कल्पनेंतला
येइल कधिं भूतला,
दिवसरात्र अंतरांत आस ही उचंबळे.

शांत सागरीं कशास उठविलींस वादळें !

# ३५

चल ये साजणि बाई ग

बालमुकुंद तो
मुरलि वाजवितो
ऐकायाची जिवास झाली घाई ग

देह कामामधें
चित्त नादामधें
मज सुचेना कामकाज कांहिं ग

मन मोहरलें
भाग्य उजळलें
जिव गुंतला गोविंदापायीं ग

चल ये साजणि बाई ग

( मांड )

## ३६

आज दिवाळीला आला माझा भाउराया
बहिणीच्या भेटीसाठीं आला भाउराया.

वाटेवरती कितीतरी शिणला असेल ग
प्रवासांत दिसभर भुकेला असेल ग
झणीं घालितें मी न्हाऊं तुला भाउराया.

अंबेमोहोराचा भात तूप कणीदार
भाऊ तुझ्यासाठीं केली पहा पुरी खीर
नीटपणें जेवायाचें अतां भाउराया.

लावियलें नीरांजन वेळ आरतीची
तबकांत ओवाळणी पडे आवडीची
ओळखलें माझें मन तुला भाउराया.

परतुनी इतुक्यांत जासि भाउराया ?
ओढ लावितें कां तुजसी वहिनीची माया ?
सुखी सर्वकाळ दोघें रहा भाउराया.

आज दिवाळीला आला माझा भाउराया.

मी झालें फुलवाली ग
गोड गोजिऱ्या कळ्यांफुलांनीं
माझी परडी भरली ग.

सोळा दुरवा, सोळा परिची–
सुंदर पत्री खुडिली ग
मनांतल्या मंगल आशांची
शोभा तिजवर चढली ग.

हिरव्या पानांमधें एकटी
ही चाफेकळि बसली ग
मनातला गोडवा दाविना
खुळी कुणावर रुसली ग.

रंगित सुमनांमागें लपली
काळि सांवळी बकुळी ग
डामडौल हिज नको रिकामा
गुणगंधानें नटली ग.

हा मखा, ही तुळसमंजिरी
बिल्वदळें रसरसलीं ग
भक्तीनें वाहतां पाहशिल
गौर शिवाची हंसली ग

मी झालें फुलवाली ग

(फिल्म:साखरपुडा)

# ३८

सखि कुणितरि मजला बोलवितें
भोळा माझा जीव कुणितरी
सौख्याशेवर डोलवितें —

वसंतसमयीं उत्साहाचा
फुलबहार उरिं उमलवितें
शिशिरामाजीं आकांक्षांचे
अंकुर अंतरिं पालवितें
कुणितरि मजला बोलवितें.

जनसमुदायीं मुखांमुखांतिल
भावार्थांतुनि लखलखतें
एकाकीपणिं प्रेमभरें मज
अपुल्यासंगें चालवितें

सखि कुणितरि मजला बोलविते

तुझ्याविना ब्रिजलाला सदैव जीव सुना
नितान्तमंजुल घे रे करांत वेणु पुन्हां.

तिच्या सुरम्य निनादें भुलें अचेतनही
फुलें नि कुंज, वहाते सताल ही यमुना.

वहायचें विसरोनी नभीं समीर उभा
उभेंचि गोधन रानीं भुलोनि जाय तृणा.

अशा तुझ्या मुरलीची स्मृती न आज तुला
कशांत चित्त रमोनि त्यजोनि जासि जनां ?

उदास मंदिरिं राधा हरी तुझ्या विरहे
सचिंत नंद यशोदा सुचें न कांहिं कुणा.

जगास जीवन द्याया समर्थ तूंचि कन्हैया
किती विनंति करावी कशी न ये करुणा ?

तुझ्याविना ब्रिजलाला सदैव जीव सुना

( मिश्र काफी )

## ४०

गोविंद गोविंद बोल रे मन
छंद असा अनमोल घे मन

निःसंगाच्या झोल्यावरती
सुखें अहर्निश डोल

वृत्तिगोपिका तुझ्या प्रमुदिता
सांवरतिल तव तोल.

जनांत गोविंद वनांत गोविंद
मनांत गोविंद बोल.
घुमविं चराचरिं प्रेमबासरी
नाचवि महि ग्रहगोल,

गोविंद गोविंद बोल

( भैरवी )

# ४१

मजमुळें तुझें जनांत होतसे हंसें रे
बोलतात तुज माझें लागलें पिसें रे

मी जातां मजमागुन
चालतोसि लपुन छपुन
परि तुझिया चरणांचे उमगती ठसे रे

मम हास्यामधिं फुलसी
आसवांत गहिवरसी
अनुदिन मज न्हाणितोसि प्रीतिच्या रसें रे

वरल्या सोंगा भुलती
जन वेडे तुज हंसती
दिसत न त्यां काय तुझ्या अंतरीं वसें रे

भाव तुझा मज उमगे
येउं कशीं तुजसंगें
घातुक उभयांस पुढें मार्ग जो दिसे रे

ये अंतरिं संकोच कशाचा
उंबरठा हा आपुलकीचा

कुणिही येवो, कुणिही जावो
पळभर अथवा अक्षय राहो
कांहीं देवो, कांहीं नेवो

रिता न येथिल कधिंही होइल—
उदंड सांठा प्रेमधनाचा !

तरुवलींवर झुलतिं पांखरें
हुंदडतीं अंगणीं वासरें
मधुगंधी वाराहि संचरे

सदैव कानीं राही घुमुनी
मंजुळ कलरव जललहरींचा !

जीवन हंसरें दोन घडीचें
हर्षभराचें नच शोकाचें
विकसायाचें भाग्य तयाचें

भू-स्वर्गाची वाट आमुची
छंद अम्हाला मंगलतेचा.

ये अंतरिं, संकोच कशाचा.

(तिलंग)

ये नववर्षा नाचत गात

गंधर्वांपरि सुरासुरांना
गुंफित अपुल्या स्वरपाशांत
ये नववर्षा नाचत गात.

इंद्रधनूपरि सप्तसुरांची कमान उभवुनि अवकाशीं
नक्षत्रांपरि मधुवचनांची करी सजावट रम्य अशी
सुविचारांचा सुगंध सुंदर दे दरवळुनी दाहिदिशीं

तेजाचा संदेश घेउनी
जशि तिमिरांतुनि येइ प्रभात

तसाच ये रे नाचत गात

ये नववर्षा नाचत गात.

( बागेश्री )

# ४४

मोगरिचे बहर आज सुकुनि चालले रे

उरला अपुराचि हार
वीणेची तुटत तार
सहवेना विरहभार मन उदासलें रे.

उत्सवांत रमति कुणी
गाती मधुगीत कुणी
मीच मात्र आंसवांत न्हात राहिलें रे

रोहिणीस धरुनि करीं
विहरतसे चंद्र वरी
वेडावुनि वरुनि तयें मजसि पाहिलें रे

ऋतु वसंत दशदिशांत
प्रणयिजना तोषवीत
वैऱ्यापरि मज त्यानें झुरत ठेविलें रे.

ये धांवत प्रिय सखया
रिझवाया — सुखवाया
तुजवांचुन अतिव्याकुल प्राण जाहले रे,

मोगरिचे बहर आज सुकुनि चालले रे.

( भीमपलास )

एकलेंपणोंचि तुला पुढतिं जायचें रे
जरि तुझिया संगतीस कुणि न यायचें रे

भीतीनें गांगरून
जरि कोणी धरिति मौन
अंतरिंचें गीत तुझें तुजसि गायचें रे

सरतां सुरळीत पंथ
दूर दडुनि बसति पांथ
काट्यांतुनि तरिहि पुढें तुज सरायचें रे

जरि न करिति कुणि स्वागत
तरि दारोदार फिरत
प्रेमपूर्ण तुज अवघें जग करायचें रे

अंधेरी रात्र असो
तेजाचा लेश नसो
तुज स्वयेंचि दीप बनुनि चिर जळायचें रे

एकलेंपणेंचि तुला पुढति जायचें रे.

( दरबारी कानडा )

चल आणि हांसत ये अंगणीं
मधु पुनवेची रात्र चांदणी

राग मधुर दुर्गा गाउंया
स्वरलहरींवर वर तरंगुया
मधुरगंधि सुमहार रचूंया
उधळूंया रसरंग जीवनीं

स्वरालापिं करिं कर जुळवूंया
तानेवरुनी नाचवुं हृदया
निर्मुनि संगीताची माया
अद्वैताची जुळवुं लावणी

सारंगीचा रंगदार रव
धिन्नकधिन्ना जलद मंद लय
येतिल सुर मुनि प्राशायास्तव
स्वरपात्रांतिल रजतरागिणी

( दुर्गा )

रविराज उदया आला
उजळाविण्यां भूतलाला
विलया तिमिर गेला
खग गाती मंजु बोला.

करिं आरती धरोनी
ये स्वागतास प्राची
उधळीत दशदिशांना
कुसुमेंहि कांचनाचीं
प्रेमार्त बालिका ही
ये नाथदर्शनाला
रविराज उदयाला आला

किरणांत सोनियाच्या
नटली अहा वनश्री
नवजीवनीं नटे हें
जग उगवल्या प्रकाशीं
ये स्फूर्ति आळवाया
प्रभुची सुरम्य लीला
रविराज उदया आला.

(चाल : ए चांद छुप ना जाना)

संध्ये, तुझ्या कपोलीं खुलते छटा गुलाली
स्मित लाजरें तुझें गे नयनांस भूल घाली

प्रतिभा कवीश्वरांची क्षितिजीं विराजलेली
सीमा असीमतेची कीं मूर्तरूप झाली ?

जगपालनीं प्रभूची काया शिणून गेली
पदसेवनास त्याच्या आली रमा महालीं ?

संध्ये, तुझ्या पदांनीं प्रीती जगांत आली
करिते अनुग्रहें जी मनुजास भाग्यशाली.

संध्ये, तुझ्या कपोलीं खुलते गुलाबलाली
कुणि रेखिली तुझ्या गे ही चंद्रकोर भालीं ?

(गझल)

तिकडली स्वारी घरास यायची
उडे तारांबळ माझिया जिवाची

कोनाकोपऱ्याची धूळ झटकली
घरास दारास निर्मळता आली
निर्मळता आली तनूला मनाला
प्रतीक्षेचा शीण क्षणीं हरपला.

गोड पक्वान्नांच्या संगें बोल गोड
बोलेन, ऐकेन, लागलीसे ओढ
रचियली शेज सफेत, सुंदर
उशाला ठेविले मोगरीचे हार.

घरांतले सारे दीप मालविले
उभी मी सज्जांत शिणवीत डोळे
रहा तारकांनों अशाच तेवत
एकाकी पांथाला तुमची संगत

चढे जाळींतून चंद्रमा आकाशीं
मनांत सांठल्या गुपितांच्या राशी
किती किती राया वेळ लाविलात
माजलें काहूर मनांत - देहांत !

होइल कां रे सांग पुरी
ही आशा माझ्या मनांतली ?

रात्र असो वा दिवस असूं दे
तुफान दर्यावर उसळूं दे
खोपटांत गणगोत असूं दे
चल हांकारूं नाव जळीं —

जळवंतीच्या निळया महालीं
उजवुन घेऊं प्रीत आपुली
फेनाची वेंचुन मुक्तावलि
सजवूं अंगांगें अपुली —

अष्टदिशांना गाउन गाणीं
गुंफूं अपुली प्रेमकहाणी
तूं मम राजा, मी तव राणी
दिगंतरा राज्यें अपुलीं —

चल चल हांकारी निज नाव
दूर माझिया मनिंचा गांव
अढळ ध्रुवापरि ठेवुनि भाव
ओलांडूं जीवन नकली —

ही आशा माझ्या मनांतली·

म्हणतें जाईन सोडून राधे तुझा शेजार
तुझ्या खट्याळ कान्ह्यानें केलें बेजार
मला केलें बेजार
वेणीफणी करुन, काजळकुंकू लेऊन
माझा ठेवणींतला शालू भरजरी
नेसून निघालें मी बाहेरी —
आला कसा कुठून
पिचकारी घेऊन
गेला विसकटून मोलाचा साजशिणगार
माझा साज शिणगार.
जातां मार्गामधून, खडे मारी मागून
माझा दहिदुधें भरला घडा
टाकतो फोडून कसा ग धडधडा
सासू छळते मला
जीव वेडावला
सुना सुना वाटे ग मला सारा संसार
सुना सारा संसार
मोठा अवखळ कान्हा, पाडतो भुरळ मना
कुंजवनांत मुरली घेउनी
छेडी मंजूळ राग-रागिणी
झालें गेलें विसरून
जीव येतो फुलून
लागे वाजाया अंतरीं प्रेमसतार
तुझ्या खट्याळ कान्ह्यानें केलें बेजार

( गौळणगीत )

पळहि न चैन जिवास तुझ्याविण
रात्रंदिन या हृदया जाळी—
हरि ! तव दर्शन आस.

कमळ जळाविण शशिविण रजनी
तीव झुरे मी हरि तुजवांचुनि
प्राण कंठिं ये व्याकुळ होउनि
साहुं कशी विरहास —

खानपान मज कांहीं सुचेना
न शिवे पळभर निद्रा नयना
काय हवें तें वाणि वदेना
कंठिं कोंडला श्वास —

किति छळितोसी हृदयरंजना
करि दीनावरि कृपासिंचना
गिरिधर गोपाला मनमोहना

दावि सुभग चरणांस, तुझ्याविण
पळहि न चैन जिवास.

(भजन)

## ५३

मी गाइन गिरिधर माझा

ये मनमोहन ये मधुसूदन
या वचनीं मी राहिन रंगुन
विसरुन अवघ्या काजा
मी गाइन गिरिधर माझा.

भवचिंतेची विझली ज्वाला
रोमरोमिं तो सगुण सांवळा
चढवी शीतल साजा
मी गाइन गिरिधर माझा.

मी हरिची, हरि माझा साजण
चरण सेवनीं रमेन अनुदिन
हरि हृदयींचा राजा
मी गाइन गिरिधर माझा.

( भजन )

५४

या सुंदर समयाला
आली सखि मज भेटायाला!
उदयगिरीवर जशी पहांटें
येइ उषा उदयाला,

नयन लाजरे वदन हांसरें
टाकित चपल पदाला,
देहलतेवर फुलवित सुंदर
भावफुलांचा झेला,

अनुरागाचीं गुंगत गीतें
रिझवित रसिक मनाला,
हर्षभरें गातसे चराचर
जणुं स्वागत गीताला,

दोन जिवांना करि अभिमंत्रित
ही मधुमीलनवेला,
आली सखि मज भेटायाला!

( जीवनपुरी )

# ५५

तुझ्या नि माझ्या जीवांची
जुळली अनुपम जोड रे

अनुपम अपुल्या प्रीतिचें
ऐकव गाणें गोड रे

हातांचा हिंदोला करुनी
सदैव मजला झुलव गडे

सिंचुनि अमृत प्रणयाचें
सदैव मजला सोड रे

अमरसुखाच्या इंद्रपुरीमधिं
नेउनि मजला सोड रे

तुझ्या नि माझ्या जीवांची
जुळली अनुपम जोड रे

( बोलकगीत )

या हंसऱ्या कुसुमकळीला
हलके हलके लहरींनों ग
सांभाळा - कुरवाळा.
अवखळ पोरी तुम्हि मुलखाच्या
ही नाजुक वेल्हाळा ग

नका पाउलें धडधड टाकित येऊं
नका सारख्या छेडित तिजला राहूं
नका आपुल्या संगें तिजला नेऊं
चला चला ग दूर पळा
गुंगत कुणिसा आला
मीलनवेला ठरे उद्यांच्या सांजेला
हो सांजेला —

या हंसऱ्या कुसुमकळीला
हलके हलके लहरींनीं ग
सांभाळा - कुरवाळा !

हे दयामया प्रभुराया रे
हे दयामया प्रभुराया.

दीन जनावर निज करुणेची
घाल सुशीतल छाया रे,

विसर पडे मज निजधर्माचा
यास्तव आलें पाया रे,

निज स्पर्शानें करि रे जागृत
मनांमनांतिल माया रे,

जियेवांचुनी वसुधातळिं या
जीवन झालें वाया रे,

हे दयामया प्रभुराया रे,

( भजन )

माझ्या प्रतिमा मनीं तुझी
दुजें न कांहीं सुचे जिवाला
पूजा तुझी - तुझी !

एकवार मी तुला पाहिलें
सदाचीच अन् स्वाधिन झालें
जिथें विलसतीं तुझीं पाउलें
तिथेंच असतें उभी -

स्वप्नीं ध्यानीं तुझेंच गाणं
मुखी अनामिक तुझे उखाणे
रोज नितनवे करुनि बहाणे
रमतें तुझ्या जगीं -

तुझे नि माझे जीनवधागे
सायासें विणिले अनुरागें
युगांयुगांतुनि येइन संगें
रवि शशि जोंवर नभीं -

माझ्या प्रतिमा मनीं तुझी !

( यमन )

तुझ्यासवें रे, तुझ्यासवें
चंद्रा ! तुझ्यासवें !
क्षणाक्षणाला मनांत माझ्या
नवजीवन पालवें –
चंद्रा ! तुझ्यासवें -

नक्षत्रांच्या मणिमोत्यांनीं
नटुनी आली रजनी राणी
ऐकविली तिज भावकहाणी
कितिदां मंजुल रवें
चंद्रा, तुझ्यासवें !

वर्षाकालीं घनमेघांचा
भीषण छाया जगास जाची
उभारिली मी नवतेजाची
दुनिया स्वरवैभवें
चंद्रा, तुझ्यासवें !

उरीं लागतां प्रणयाचा शर
व्याकुल झालें जधिं हृदयांतर
पाठविला संदेश खुणेचा
देउनियां आसवें
चंद्रा, तुझ्यासवें

आज दशादिशीं पुनव हांसते
जीवनजळ मनमुक्त उसळतें
उरांत माझ्या रंग रसाचें
गीत उमलतें नवें
चंद्रा तुझ्यासवें !

( भैरवी )

थयथयथय हृदयांगणिं माझ्या
प्रेममयूरा नाच रे

नाचवीत त्रैलोक्य तुजसवें
भान हरपुनी नाच रे

इथें सुखाची शीतल छाया
आशांची मधुगंधित माया
तरल उमेदी ताल धराया
स्फुरति कल्पना, जणुं लखलखती
हिरे माणकें पाच रे !

स्वतंत्रतेची सुरेख सरगम
निनादेल तव चरणीं रुमझुम
स्फुरतां तुजला नृत्य मनोरम
प्रेयाचे धन अविरत करितिल
तुझ्या शिरीं बरसात रे !

अवगणुनी हें वैभव सारें
मान मुरडुनी जाउं नको रे
जुळतिल अपुले धागेदोरे
संगतींत श्रेयाच्या तुटतिल
जीर्ण जिण्याचे पाश रे

थयथयथय हृदयांगणिं माझ्या
प्रेममयूरा नाच रे !

( शंकरा )

## ६१

बापू ! तुमच्या ज्योतिनें लाख ज्योत लागली
त्या ज्योतींची घरांघरांतुनि स्वर्णकांति फाकली

बापू ! तुमच्या ज्योतिनें एकाकी तळपुनी
दीनांना, दलितांना पुढली सुगम वाट दाविली,

बापू ! तुमच्या ज्योतिचा अनाथांस आसरा
तिचाच ऐकुनि बोल हांसरा खिन्न मनें तोषलीं,

बापू ! तुमच्या ज्योतिला कल्पकुसुम मानुनी
सुरांगनांनीं उचलुनि नेलें काय आमुच्यांतुनी ?

बापू ! तुमच्या ज्योतिला प्रदक्षिणा आमुची
तिचाच आम्हां असे विसावा, तीच अम्हां माउली

बापू ! तुमच्या ज्योतिनें लाख ज्योत लागली !

( भैरवी )

# ६२

ताऱ्यांनीं संगत केली
अन् रात्र सरुनियां गेली.
निद्रेनें जें गीत गायिलें
त्या जादूनें विश्व गुंगलें
परि एकान्तीं काळोखांतहि
मजला नीज न आली
ताऱ्यांनीं संगत केली.
पुसलेल्या स्मृतिच्या रुपाकृति
नक्षत्रांतुनि उमटुनि येती
परोपरींचीं रूपें त्यांचीं
पाहुनि प्रतिभा भुलली
ताऱ्यांनीं संगत केली.
अधुन मधुन वायूची लहरी
तरळत कसलें गुपित पुकारी
तार जिवांतिल पावुनि कंपन
सुस्वर छेडित गेली
ताऱ्यांनीं संगत केली
तारांगण मनिं नयनीं नाचे
विरघळले निर्बंध जगाचे
अज्ञातांतुनि मज शांतीची
सुखद प्रेरणा आली
ताऱ्यांनीं संगत केली.

(धोलकगीत)

# ६३

माझ्या घरांत कधिं ग वाजेल रुणुझुणु
वाजेल धुंगुरवाळा
कधिं अंगाइ गाउनि हलविन घडिघडि
झुलविन मी हिंदोला.
स्मृति मजला कौसल्येची
देवकिची, नंदराणीची
पुरुषोत्त प्रसवून जयांनीं
भूषविलें जगताला
निजशिशुच्या अचपळ लीला
कधिं दिसतिल मम नयनाला
गमे अचेतन मज जगजीवन,
शोभा नच साचेराला
वत्सलतेची बनवुनि मूर्ती
ओवाळिन मी अंतज्योतीं
स्वप्राणांची बांधिन पूजा
येइल पुण्य फळाला.
माझ्या घरांत कधिं ग वाजेल रुणुझुणु
वाजेल धुंगुरवाळा.

# ६४

तुझ्या पाउलांमागुती मज आहे यावयाचें
तुझ्या संगतीचें सुख मज आहे घ्यावयाचें

एकवार मार्गांतून— दारीं मजला पाहून
पळभर थांबलास— गोड गूढ हांसलास
तेंच हास्य तुझ्या मुखीं मज आहे पहायचें !

दिलास तूं प्रळयांत—मज दीनेलागीं हात
सोशिल्या तूं माझ्यासाठीं—जीवनाच्या आटाअ
तुझें अनमोल ऋण मज आहे फेडायाचें !

घुमवीन कंठांतून तुझ्या आकांक्षांचे गान
लेखणीनें रेखाटीन तुझें चारित्र्य महान
तुझ्यासवें प्राणगीत मज आहे गावयाचें

तुझ्या पाउलांमागुती मज आहे यावयाचें.

प्रणति शिव शंकरा करित करुणाकरा
चल अचल सृष्टिच्या सूत्रधारा !

लव न थारा जगीं शांतिला राहिला
न्यायनीती नुरे, खल प्रबल माजला
सत्वरी आवरीं हा पसारा — १

दिव्य तांडव तुझें मांड नट नागरा
ओघ शिरिंचा जगीं सोड गंगाधरा
प्रगटि किमया तुझी जादुगारा — २

सांब भोळा तुला वानिती सत्कवी
याचि अभिधानिं तव विलसते थोरवी
करि कृपा सुरनृपा हे उदारा — ३

( राग शंकरा )
ताल झपताल.

# ६६

अनुरागामधिं आळवीन मी तुझ्या प्रीतिची गाथा
कथेन हृद्‌या ताल धराया, ये परिसाया नाथा
तुझ्या प्रीतिची गाथा.

नभांगणीं तूं मला दाविली शोभा समरसतेची
जलाशयीं शिकविली मला तूं किमया प्रतिबिंबाची
तूंच मला लाविलें गावया माझ्या प्रणयवसंता !.
तुझ्या प्रीतिची गाथा !

मेघ सावळे खेदाचे तव झाकळतील मनास
रजतवर्ण स्वरमाला माझ्या किनारतील तयास
झरतिल झरझर जीवनधारा, फुलेल वसुधामाता,
तुझ्या प्रीतिची गाथा !

जग हसलें तर हंसो, आपणा अपुलें मीलनगान
चल ये राया, सवें विहरुंया, डुलवूं रानोरान,
डुलेल वारा, डुलतिल तारा, चंद्र डोलविल माथा
तुझ्या प्रीतिची गाथा.

अनुरागामधिं आळवीन मी तुझ्या प्रीतिची गाथा.

६७

या घन अंधारांतुनि मजला नेइ प्रकाशाकडे !
प्रकाशांतुनी मला बघूं दे तुझ्या स्वरूपाकडे

कोलाहल भंवतालि दाटला
पुकारुनी तुज कंठ शोपला
प्रेमपूर्ण पडसाद तुझा मम श्रवणावर येउं दे

दुर्गम दिसतां वाट पुढें ही
सुन्या भासतां दिशा दहाही
अखंडतेची उमेद माझ्या चरणतळीं खेळुं दे

मार्गांतिल रंजले गांजले
म्हणावयासी सखे आपुले
स्नेहझरा उरिंचा खळखळुनी जीवनभर वाहुं दे
या घन अंधारांतुनि मजला नेइ प्रकाशाकडे !

( माइ )



# ग. पां. परचुरे प्रकाशन मन्दिराचें
# तेजस्वी मराठी वाङ्मय

| | | | |
|---|---|---|---|
| १८५७ चें स्वातंत्र्यसमर | १२॥ | सिंहगड | ·॥· |
| हिन्दुत्व | २॥ | बाजीप्रभु | ·॥· |
| हिन्दुराष्ट्र-दर्शन | ६ | चाफेकर-रानडे | ·।= |
| हिन्दुत्वाचे पंचप्राण | ३ | रानफुलें | २ |
| हिन्दुपदपादशाही | ५ | तेजस्वी तारे | २ |
| शि. ल. करन्दीकरलिखित | | र. गो. सरदेसाआीलिखित | |
| सावरकरांचे सहकारी | १॥ | आमचा संसार | २॥ |

## कादंबऱ्या

| | | | |
|---|---|---|---|
| बाल बहिर्जी—पिरोज आनन्दकर | २ | राजाराणी | २ |
| सिंहाचे छावे—टॉलस्टॉय | ३ | सप्रेम भेट | १॥ |
| बापलेक—टुर्गेनिव्ह | ३ | कॉंग्रेसचा कल्पवृक्ष | १॥ |
| कबुतराची कथा | ·।= | झुंझार महाराष्ट्र | ·॥· |

## नाटकें

| | | | |
|---|---|---|---|
| लोकसिंहासन—शुक्ल | १॥ | बेबंदशाही—बि. ह. औंधकर | २ |
| भगवा झेंडा—ब्रोडस | १॥ | आग्र्याहून सुटका ,, | २ |
| पूज्य गांधीजी ,, | १। | लक्षाधीश—मधुकर राव | १। |
| छत्रपतीचा छावा ,, | ·॥· | सिंहगर्जना—ओक | १ |
| महावीर कर्ण ,, | ·॥· | वीर अभिमन्यु—शुक्ल | ·॥· |
| वासुदेव बळवंत | १॥ | जयद्रथ—वध ,, | ·॥· |
| दोन लग्नें—देसाआी | ·॥। | पारध—सौ. बेडेकर | १। |
| जातिवंत जवान—परचुरे | १। | पुढचें पाऊल | १। |
| राणा प्रताप | ·॥· | रोजारी—पाजारी | १॥ |
| जयमल्हार | १॥ | झुंझार झांशीवाली | ·॥· |

सेनापती तात्या टोपे ·॥·

## अितर प्रकाशनें

| | | | |
|---|---|---|---|
| संगीताचे मानकरी | २॥ | मुंबआीचे मानकरी | २ |
| प्रेमगीतें | ·।= | लिपिशुद्धीचें आन्दोलन | २॥ |
| जनाचे श्लोक | ·।· | अभिनव भारत | ४ |